**पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील ३१ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२४ ते दि.३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

शासन निर्णय क्रमांक : आस्था ४९२४/प्र.क्र.१०६/पापु-०१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, ७ वा मजला, क्रॉफर्ड मार्केट जवळ,

लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.

दिनांक : २७ मार्च, २०२४.

**वाचा** :- (१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र.१०८/पापु-०१, दिनांक १५ सप्टेंबर, २०२३

(२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र.१०९/पापु-०१, दिनांक १५ सप्टेंबर, २०२३

(३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र.११०/पापु-०१, दिनांक १५ सप्टेंबर, २०२३

(४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र.आस्था-२०१६/प्र.क्र.२९८/पापु-०१, दि.२८.१२.२०२३

(५) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४.

(६) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.आस्था ४९२४/प्र.क्र.१०६/पापु-०१, दि.२६ मार्च, २०२४.

**<u>प्रस्तावना</u> :**

संदर्भाधिन (१) ते (३) येथील शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छत विभागातील ६१ अस्थायी पदांना मुदतवाढ दिली आहे. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या उक्त वाचा क्रमांक ४ येथील दिनांक २८ डिसेंबर, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील (खुद्द) १५४ पदांचा सुधारित आकृतिबंध निश्चित करण्यात आला असुन दि. २६ मार्च, २०२४ रोजीच्या

शासन निर्णयान्वये एकूण १५४ पदांपैकी १२३ स्थायी पदे तसेच ३१ अस्थायी पदे म्हणून निश्चित करण्यात आली आहेत. वित्त विभागाने दि.२१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार दिले आहेत.

०२. त्यानुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील ३१ अस्थायी पदांना पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय** :

केंद्र शासन व राज्य शासनाच्या धोरणानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत पिण्याचे शुध्द व पुरेसे पाणी आणि स्वच्छतेच्या सुविधा उपलब्ध करावयाच्या अनुषंगाने योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी विभागाला अधिक मनुष्यबळाची आवश्यकता निर्माण झाली आहे. यास्तव पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील ३१ अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक आहे.

०२. सबब, उपरोक्त वाचा क्रमांक ३ येथील वित्त विभागाच्या दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र- अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील ३१ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२४ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

०३. खालील तक्त्यातील संवर्ग मृत ठरविण्यात आले असून या संवर्गात कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या पदोन्नती/ सेवानिवृती/राजीनामा/ मृत्यू इ. कारणामुळे पद रिक्त झाल्यानंतर ते पद आपोआप व्यपगत होईल.

| अ.क्र. | संवर्ग | कार्यरत कर्मचाऱ्यांची संख्या |
|---|---|---|
| १ | नाईक | १ |
| २ | शिपाई | ११ |
| ३ | वाहनचालक नि सर्वसाधारण सहायक | १ |
| | एकूण | १३ |

०४. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-५, लेखाशिर्ष-३४५१-सेक्रेटरीएट आर्थिक सेवा-०९०-सेक्रेटरीएट (१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (३४५१ ०४६७) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षाच्या मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक २१ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७११११९५८६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASA
HEB B
HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2024.03.27 14:07:04 +05'30'

**( बाळासाहेब हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४. उप सचिव, वित्त विभाग (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
५. अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
६. अवर सचिव / कार्यासन अधिकारी (पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
७. निवडनस्ती (पापु-०१)

## प्रपत्र – अ

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था ४९२४/प्र.क्र. १०६/पापु-०१,
दिनांक २७ मार्च, २०२४ चे सहपत्र.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील अस्थायी पदे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहसचिव/उपसचिव | १ |
| २ | सहसंचालक सांख्यिकी | १ |
| ३ | अवर सचिव | २ |
| ४ | उप अभियंता | २ |
| ५ | कक्ष अधिकारी | ४ |
| ६ | प्रकल्प अधिकारी | १ |
| ७ | लेखा अधिकारी | १ |
| ८ | सांख्यिकी अधिकारी | १ |
| ९ | सहायक कक्ष अधिकारी | ६ |
| १० | उप लेखापाल | १ |
| ११ | संगणक यंत्र चालक | १ |
| १२ | उच्चश्रेणी लघुलेखक | २ |
| १३ | लघुटंकलेखक | २ |
| १४ | लिपिक-टंकलेखक | ६ |
| | **एकुण पदे** | **३१** |

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2024.03.27 14:07:31 +05'30'

**( बाळासाहेब हजारे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**